

# बेडूक आणि अनोळखी

मैक्स

# बेडूक आणि अनोळखी

मैक्स

मराठी : अश्विनी बर्वे





एक दिवस, एक अनोळखी आला आणि जंगलाच्या कडेला त्याने आपला तंबू लावला. डुक्कराने त्याला सगळ्यात आधी बघितलं.



“तू त्याला पाहिलं का?” डुकराने बदक आणि बेडकाला भेटल्यावर उत्साहाने विचारलं.

“नाही, तो दिसायला कसा आहे?” बदकाने विचारलं.

“माझ्या मते तो एक घाणेरड्या उंदरासारखा दिसतो,” डुक्कर म्हणाले.

“आपण उंदरांपासून सावध राहायला हवं,” बदक म्हणाले. “ते पक्के चोर असतात.”



“हे तुम्हांला कसं माहिती आहे,” बेडकाने विचारलं.

“प्रत्येकाला माहित आहे,” बदकाने रागाने म्हटलं. पण बेडकाला त्याबाबत खात्री नव्हती. तो स्वतः बघू इच्छित होता. त्या रात्री, जेव्हा अंधार पडला तेव्हा त्याने लांबून एक लाल चमकणारे काहीतरी पाहिले, बेडूक त्याजवळ गेला.

जंगलाच्या कडेला त्याने बांबूच्या चौकटीवर बांधलेला कापडी तंबू बघितला.

तो अनोळखी शेकोटीवर भांडं ठेवून जेवण शिजवत होता. त्याचा चांगला सुगंध येत होता. बेडकाला तिथं सगळं काही खूप चांगलं वाटलं.

“मी त्याला पाहिलं,” दुसऱ्या दिवशी बेडकाने इतरांना सांगितलं.
“आणि काय?” डुकराने विचारलं.
“तो एक चांगला साथी वाटतो,” बेडूक म्हणाला.



“त्याच्यापासून सावध रहा!” डुक्कर म्हणाले. “लक्षात ठेव तो एक घाणेरडा उंदीर आहे!”
“मी पैज लावतो की तो एक दिवस काही काम न करता आपलं सर्वांचं खाणं खाईल,” बदक म्हणाले, “उंदीर घाणेरडे आणि आळशी असतात.”



पण हे खरं नव्हतं. उंदीर नेहमी कामात व्यग्र असे. त्याने लाकडं गोळा केली आणि मोठ्या कौशल्याने एक टेबल आणि एक बाक तयार केले. तो घाण नव्हता.तो नेहमी नदीत अंघोळ करत असे. तसा तो काहीसा भीतीदायक दिसायचा.



एक दिवस बेडकाने उंदराला भेटायचं ठरवलं. उंदीर उन्हात आपल्या नवीन बाकावर आराम करत होता. “हॅलो” बेडूक म्हणाला. “मी बेडूक आहे.”
“मला माहित आहे,” उंदीर म्हणाला. “मी बघू शकतो, मी वेडा नाही. मी वाचू शकतो आणि लिहू शकतो आणि मला तीन भाषा बोलता येतात- इंग्रजी,फ्रेंच आणि जर्मन.”
बेडूक, उंदरामुळे खूपच प्रभावित झाला. असं तर ससा सुद्धा करू शकत नव्हता.



तेव्हा डुक्कर सुद्धा तिथं येऊन पोहचलं.
“तू कुठून आला आहेस?” त्याने उंदराला रागाने विचारलं.
“प्रत्येक ठिकाणाहून आणि कुठूनच नाही,” उंदराने शांततेनं उत्तर दिलं.
"ठीक आहे, तू तुझ्या घरी परत जा,” डुक्कर ओरडलं.
“इथं तुझं काही काम नाही.” उंदीर एकदम शांत झाला.

"मी जगभर प्रवास केला आहे," उंदीर म्हणाला. "इथं खूप शांतता आहे आणि नदीजवळ एक सुंदर दृश्य आहे. मला ही जागा आवडली आहे."



"मला वाटतं की तू आमची लाकडं चोरली आहेत," डुक्कर म्हणाले.
"मी ती गोळा केली आहेत," उंदराने सभ्य आवाजात म्हटलं.
"ही लाकडं सर्वांची आहेत."
"घाणेरडा उंदीर!" डुक्कर बडबडले..
"हो, हो," उंदीर दुःखी होत म्हणाला. "सगळी चूक माझीच आहे. उंदराला नेहमीच सगळ्या गोष्टीसाठी दोषी धरलं जातं."



बेडूक,डुक्कर आणि बदक, सश्याला भेटायला गेले.
"त्या घाणेरड्या उंदराने ती जागा सोडायला हवी," डुक्कर म्हणाले.
"तिथं राहण्याचा त्याला काही अधिकार नाही, तो आमची लाकडं चोरतो. आणि त्याबरोबरच तो उद्धटपणा वागतो,"बदक ओरडले."
"शांत, शांत," ससा म्हणाला. "तो आपल्यापेक्षा दिसायला वेगळा असू शकतो, पण तो काही चुकीचं करत नाही आणि राहिली लाकडाची गोष्ट, ती सर्वांची आहेत."



त्यादिवसापासून बेडूक नियमित उंदराला भेटायला जावू लागला.
ते बाकावर खांद्याला खांदा लावून बसत आणि समोरच्या सुंदर दृश्याचा आनंद घेत.
उंदीर, बेडकाला जगभरच्या आपल्या कारनाम्यांच्या गोष्टी ऐकवत असे, कारण त्याने तमाम देशांचा प्रवास केला होता आणि त्याने काही रोमांचक अनुभव घेतले होते.



डुक्कर बेडकाला रागवले.
“तू त्या घाणेरड्या उंदराच्या घरी चक्कर टाकायला नको,” ते म्हणाले.
“का नको?” बेडकाने विचारले.
“कारण आमच्यापेक्षा तो वेगळा आहे,” बदक म्हणाले.
“वेगळा,“ बेडकाने विचारलं. “पण आपणही एकमेकांपेक्षा वेगळे आहोत.”
“नाही.“ बेडूक म्हणाला. “आपण एक दुसऱ्या बरोबर आहोत, उंदीर इथला नाही.”





मग एक दिवस, डुक्कर स्वयंपाक करत असतांना त्याचे लक्ष नव्हते. कढईतून ज्वाला वर आल्या. लवकरच आग सगळीकडे पसरली आणि आगीच्या ज्वालांमध्ये त्याचे घर जळू लागले.

डुक्कर घाबरून बाहेर पळालं. “वाचवा!वाचवा!” ते ओरडलं. पण उंदीर तिथं सगळ्यात आधी हजर होता. त्याने नदीतून पाण्याच्या बादल्या भर-भरून आणल्या आणि आग विझे पर्यंत ज्वालांशी लढत राहिला..





डुकराच्या घराचे छत पूर्णपणे नष्ट झाले. सगळे प्राणी या प्रसंगामुळे दुःखी होते. आता डुक्कर बेघर झाले होते. पण ते चिंतेत नव्हते. दुसऱ्या दिवशी उंदीर हातोडी आणि खिळे घेवून आला. त्याने फटाफट घराच्या छताची डागडुजी केली.

एक दिवस ससा थोडं पाणी आणण्यासाठी नदीवर गेला. अचानक तो घसरला आणि खोल पाण्यात पडला. सश्याला पोहता येत नव्हते. “वाचवा वाचवा!” ससा जोरात ओरडला. उंदराने सगळ्यात आधी सश्याचे ओरडणे ऐकले आणि मग त्याने सरळ पाण्यात उडी घेतली. लवकरच त्याने सश्याला वाचवलं आणि त्याला सुरक्षित कोरड्या जागी आणलं.

उंदीर तिथं राहू शकतो यावर सगळे आता सहमत होते. उंदीर खूपच उदार होता आणि जर कोणाला कशाची मदत हवी असेल तर तो नेहमी त्यावेळी हजर असे.

उंदीर नेहमी मजेदार गोष्टींचा विचार करत असे तो नदीच्या काठी पिकनिक आयोजित करत असे किवा बाकी प्राण्यांना जंगलात सैर करायला घेवून जात असे.



संध्याकाळी उंदीर त्यांना चीनी ड्रॅगनची रोमांचक कहाणी ऐकवत असे. त्याने त्यांना जगाबद्दल कितीतरी रोचक गोष्टी सांगितल्या. तो एक खूपच आनंदी उंदीर होता आणि उंदराजवळ नेहमी सांगण्यासाठी नवे नवे किस्से असत.

पण एक दिवस जेव्हा बेडूक आपला मित्र उंदराला भेटायला गेला तेव्हा त्याच्या डोळ्यावर विश्वास बसला नाही. उंदराचा तंबू जमिनीवर घडी करून पडला होता आणि उंदीर आपलं बाचकं घेवून उभा होता.



“तू जात आहेस काय?” आश्चर्याने बेडकाने विचारलं.
“हो, आता पुढच्या प्रवासाची वेळ झाली आहे,” उंदीर म्हणाला.
“मी अमेरिकेत जात आहे कारण तो देश मी याआधी पाहिला नाही.” हे ऐकून बिचारा बेडूक उद्ध्वस्त झाला.

त्यानंतर तो घाणेरडा,पण चांगल्या मनाचा, मदत करणारा आणि चतुर उंदीर निघून गेला. त्याचे मित्र तोपर्यंत हात हलवत राहिले जोपर्यंत तो डोंगराच्या मागे जात नाही. “आपण नेहमी त्याला लक्षात ठेवू,” सशाने खोल श्वास घेत म्हटले.



डोळ्यातील पाण्याबरोबर बेडूक,बदक, ससा आणि डुकराने आपल्या मित्राला उंदराला अच्छा म्हटलं. “कदाचित मी एक दिवस परत येईन,” उंदराने आनंदाने म्हटलं. “मग मी नदीवर एक पूल बांधेन.”

हो, उंदीर आपल्या मागे एक मौन आणि रिकामंपण सोडून गेला. पण त्याने तयार केलेलं बाकडं तिथंच होतं आणि त्याचे चारी मित्र नेहमी त्यावर एकत्र बसून आपल्या मित्राची उंदराची आठवण काढत असत.

समाप्त



जेव्हा एक अनोळखी जंगलात येतो,तेव्हा बेडकाचे मित्र त्याच्याकडे संशयाने बघतात.त्यांना वाटते की उंदीर घाणेरडा आणि चोर असेल.पण बेडकाचा यावर विश्वास बसत नाही.तो स्वतः अनुभव घेवून निर्णय घेतो आणि उंदराशी मैत्री करतो.पण नंतर उंदीर काही संकटाच्या वेळी दुसऱ्यांना वाचवतो. शेवटी दुसऱ्यांना विश्वास वाटतो की वेगळे दिसणारे प्राणी सुद्धा खूप चांगले आणि प्रामाणिक असू शकतात.

मॅक्स एक उत्तम कलाकार आहेत, ज्यांची पुस्तके कोवळ्या हास्यासाहित महत्वपूर्ण विषयांना स्पर्श करतात.